





**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**

**दुरध्वनी क्र ०२२-२२७९३६१८** Email Id : GAD_१२A@maharashtra.gov.in

---

क्रमांक : मप्रप्र २०२५/प्र.क्र.२०/प्रशि-४ दिनांक : ०४ एप्रिल, २०२५.

प्रति,
सह/उपसचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय,मुंबई.

विषय : मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर(उ) पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या संस्थेतील रिक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत

संदर्भ : १.सा.प्र.वि. शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दि.१७.१२.२०१६
२.सा.प्र.वि.शा.नि.क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/का.१२, दि.१६.०२.२०२१८
३. सा.प्र.वि.शा.नि.क्र.टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३.०९.२०११
४. सा.प्र.वि.शा.नि.क्र.यशदा २०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/१२-अ, दि.११.०५.२०१५

महोदय/महोदया,

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेमध्ये राज्य प्रशिक्षण धोरण २०११ नुसार राज्य प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत शासन सेवेतील अधिकारी वर्ग-२ व वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांसाठी प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात येतात. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.यशदा-२०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/-१२-अ, दि.११ मे, २०१५ अन्वये विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थासाठी पदांचा आकृतीबंध मंजूर असून सदर पदे भरण्याची कार्यपध्दती व पदांच्या कर्तव्ये व जबाबदाऱ्या विहित केल्या आहेत.

त्यास अनुसरुन सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय मुंबई यांच्या अधिपत्याखालील मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या कार्यालयातील राज्य प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत खालील नमूद केलेली पदे शासकीय अधिकारी / कर्मचारी यांचे मधून प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी विहित नमुन्यात अर्ज मागविण्यात येत आहेत. संबंधीत संवर्गात इच्छूक किंवा पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास निम्न संवर्गात व श्रेणीमध्ये समकक्ष पदावरील पदोन्नतीसाठी विहीत केलेली अर्हता व अनुभव पूर्ण करणाऱ्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचाही या पदावर प्रतिनियुक्तीसाठी विचार केला जाईल.

| अ.क्र. | पदनाम | गट | पदांची संख्या | पदाची वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|
| १ | सहाय्यक प्राध्यापक वर्ग-१ | अ | ७ | एस-१९-५५१००-१७५१०० |
| २ | कार्यालय अधीक्षक वर्ग-३ | क | १ | एस-१३-३५४००-११२४०० |
| ३ | वसतीगृह तथा आवार व्यवस्थापक | क | १ | एस-१३-३५४००-११२४०० |
| ४ | ग्रंथपाल | क | १ | एस-८-२५५००-८११०० |
| | एकूण | | १० | |

२. प्रतिनियुक्तीने नियुक्ती प्रथमत: तीन वर्षाच्या कालावधीसाठी राहील, तदनंतर आवश्यकता विचारात घेऊन संबंधीत अधिकारी यांची इच्छुकता व प्रतिनियुक्तीने सेवा देणा-या संवर्ग नियंत्रण प्राधिका-याच्या सम्मतीने हा कालावधी जास्तीत जास्त ५ वर्षापर्यंत वाढविता येईल.

३. सर्व प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक त्यांच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या वर नमूद केलेल्या संवर्गातील सर्व अधिकारी यांच्या निदर्शनास आणण्यात यावे.

४. सदर पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी इच्छुक व पात्र अधिकारी/कर्मचारी यांनी त्यांचे अर्ज सोबत जोडलेल्या विहीत नमून्यात टंकलिखित करुन त्यांच्या प्रशासकीय विभागामार्फत निम्न स्वाक्षरीतांकडे **दिनांक २४/०४/२०२५** पर्यंत सादर करावे. त्यानंतर प्राप्त होणारे अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

५. प्रतिनियुक्तीने नियुक्ती घेऊ इच्छिणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांनी ते सद्या शासन सेवेत असल्याबाबतचे त्यांच्या कार्यालय प्रमुखाचे प्रमाणपत्र अर्जासोबत जोडावे.

६. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्या-१२, दि.१७.१२.२०१६ व व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दि.१६.२.२०१८ आणि सामान्य प्रशासन विभाग क्र.यशदा-२०१४/४४१/प्र.क्र.९३/१४/कार्या-१२-अ, दि.११.०५.२०१५ मधील निर्धारित तरतुदी, अटी व शर्तीनुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत अर्जाची तपासणी करण्यात येईल.

७. प्रशासकीय विभागानी / संवर्ग नियंत्रक विभागानी परिपूर्ण स्वरुपातील अर्ज त्यांचे आवश्यक प्रमाणपत्रांसह व संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांच्या मागील ५ वर्षाचे गोपनिय अहवालाच्या सत्यप्रतीसह या विभागाकडे कोणत्याही परिस्थीतीत **दिनांक २४/०४/२०२५** पर्यंत पाठवावेत. विहीत मुदतीत अर्ज प्राप्त न झाल्यास अशा अधिकारी/कर्मचारी यांचा प्रतिनियुक्तीसाठी विचार केला जाणार नाही.

८. अंतिम दिनांकापर्यंत प्राप्त अर्जाची छाननी केल्यानंतर पात्र अर्जाबाबत प्रस्ताव सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्यात येतील.

सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४०४११३९१४९७०७ हा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

आपली,

NAMRATA SHASHANK BHARSAKHALE

Digitally signed by NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=afc239a04f8765fdfaff5b427895a52f52390a276568759df519aea12578512c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7A55E217A5A7B81D43819C528413DCC573FB455C923C289F62184B4155ED280, cn=NAMRATA SHASHANK BHARSAKHALE
Date: 2025.04.04 11:46:18 +05'30'

**(नम्रता भारसाखळे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर.

२. निवडनस्ती- प्रशि-४

## परिशिष्ट-ड

## प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अर्जदारांनी करावयाच्या अर्जाचा नमुना

<table>
<tr><td>१)</td><td>अधिकारी/कर्मचारी यांचे संपूर्ण नांव</td><td></td></tr>
<tr><td>२)</td><td>ज्या पदासाठी अर्ज केला आहे ते पद व कार्यालयाचे नांव</td><td></td></tr>
<tr><td>३)</td><td>सध्या धारण केलेले पद व पदस्थापनेचे ठिकाण</td><td></td></tr>
<tr><td>४)</td><td>सध्या घेत असलेली वेतनश्रेणी</td><td></td></tr>
<tr><td>५)</td><td>सध्या कार्यरत असलेल्या पदाचा संवर्ग नियंत्रक विभाग</td><td></td></tr>
<tr><td>६)</td><td>भविष्य निर्वाह निधी /राष्ट्रीय निवृत्ती वेतन</td><td></td></tr>
<tr><td>७)</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>८)</td><td>अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकास असलेले वय (वर्ष व महिने)</td><td></td></tr>
<tr><td>९)</td><td>अधिकारी /कर्मचाऱ्यांनी घोषित केलेला स्वग्राम तालुका व जिल्हा</td><td></td></tr>
<tr><td>१०)</td><td>प्रथम नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>११)</td><td>सध्याच्या पदावरील नियुक्तीचा दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>१२)</td><td>सेवानिवृत्तीचा दिनांक ( पहा शा.नि.दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतूद ५ ( ब ) ( ६ )</td><td></td></tr>
<tr><td>१३)</td><td>सध्या धारण केलेले पद नियमित आहे किंवा तात्पूरते आहे, नियमित असल्यास नियमित दिनांक</td><td></td></tr>
<tr><td>१४)</td><td>शैक्षणिक अर्हता व अनुभव</td><td></td></tr>
<tr><td>१५)</td><td>मागासवर्गीय प्रवर्गात येत असल्यास, प्रवर्ग</td><td></td></tr>
<tr><td>१६)</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>१७)</td><td>आतापर्यंत केलेल्या सेवेचा तपशील<br>(जागा कमी असल्यास स्वतंत्र विवरणपत्र जोडावे व त्यावर स्वत:ची स्वाक्षरी करावी.)
<table>
<tr><td>कार्यालय/विभाग</td><td>पद (संवर्ग) अथवा प्रतिनियुक्तीवर</td><td colspan="2">कालावधी</td><td>वेतनश्रेणी</td><td>कामाचे स्वरुप</td></tr>
<tr><td></td><td></td><td>पासून</td><td>पर्यंत</td><td></td><td></td></tr>
</table>
</td><td></td></tr>
<tr><td>१८)</td><td>मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत)</td><td></td></tr>
<tr><td>१९)</td><td>मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर केले आहे का ? (दि.३१.३.२०२४ रोजीचे)</td><td></td></tr>
<tr><td>२०)</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का ? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>२१)</td><td>संबंधित कर्मचाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद, ठिकाण व कालावधी)
<table>
<tr><td>दि.--------पासून<br>दि.--------पर्यंत</td><td>पद</td><td>प्रतिनियुक्तीचे ठिकाण (कार्यालय)</td></tr>
</table>
</td><td>प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी ---------वर्षे</td></tr>
<tr><td>२२)</td><td>संबंधित कर्मचाऱ्याविरुध्द विभागीय चौकशी/न्यायालयीन प्रकरणे सुरु अथवा प्रस्तावित आहे काय ?</td><td></td></tr>
<tr><td>२३)</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का ?</td><td></td></tr>
<tr><td>२४)</td><td>प्रतिनियुक्तीकरिता विभागाची सहमती आहे किंवा कसे ?</td><td></td></tr>
</table>

संपर्क तपशिल :-

**अ) पत्ता :** ---------------------------------------------------
---------------------------------------------------
---------------------------------------------------
दुरध्वनी क्रमांक : ------------------------------------------
ई-मेल : ---------------------------------------------

**ब) कार्यालयीन पत्ता :** ---------------------------------------------------
---------------------------------------------------
---------------------------------------------------
दुरध्वनी क्रमांक : ------------------------------------------
ई-मेल : ---------------------------------------------

मी श्री/श्रीमती ------------------------------------------ असे प्रमाणिक करतो/करते की, मी प्रतिनियुक्तीने भरावयाचया पदाच्या मागणीपत्रातील तपशील वाचले असून पदासाठी विहित केलेल्या अर्हता मी धारण करीत असल्याने सदर पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अर्ज सादर करीत आहे. अर्जात नमूद केलेली माहिती खरी असून खोटी आढळून आल्यास माझा अर्ज नाकारला जाऊ शकतो याची मला जाणीव आहे.

सही

(नाव)

पदनाम ------------------------------------